अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गातून मुख्य अभियंता (स्थापत्य) या संवर्गात पदोन्नती / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
**शासन आदेश क्रमांकः पीओजी-१३२२/ प्र.क्र. १८१/ सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९ जुलै, २०२३.

वाचा :- सा.बां. विभाग अधिसूचना क्रमांक : आरटीआर १०८३/(५७३)(१)/आस्था-१, दिनांक २०.६.१९८६

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गात कार्यरत असलेल्या खालील अधिकाऱ्यांना, संदर्भाधिन दिनांक २०.६.१९८६ च्या अधिसुचनेन्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, मुख्य अभियंता (स्थापत्य) या पदावर (सुधारित वेतन मॅट्रीक्स एस-२९ : १३११००-२१६६००) (असुधारित वेतन संरचना पी.बी.-४ वेतन बँड रूपये ३७४००-६७००० ग्रेड वेतन ८९००/-) या वेतन संरचनेत सन २०२२-२३ च्या निवडसूचीच्या क्रमानुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार रिक्त पदावर पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नतीउपरांत मुख्य अभियंता (स्थापत्य) संवर्गातील त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १. | १४३<br>१३.५.२०२२ | श्रीमती ज्योती चारुदत्त कुलकर्णी | अधीक्षक अभियंता व राज्य गुणवत्ता समन्वयक, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे | **प्रपत्र बढती** - मुख्य अभियंता व राज्य गुणवत्ता समन्वयक, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे |

२. वर नमूद अधिकाऱ्यांची सदर पदोन्नती ही पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून करण्यात येत आहे :

i. सदर पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयास अधीन राहून तसेच रिट पिटीशन स्टँप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५.५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

ii. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने पदोन्नतीच्या परिणामी त्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

३. वर नमूद अधिकाऱ्यांना देण्यात आलेली सदर पदोन्नती ही कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. वरील तक्त्यातील श्रीम. ज्योती चा. कुलकर्णी यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१

मधील नियम ४०, परिशिष्ट-२, अट क्र. १८ नुसार तात्पुरत्या स्वरुपात प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसासर प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहील.

संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, श्रीम. कुलकर्णी पदोन्नतीच्या पदावर कोणत्या दिनांकास हजर झाल्या याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

५. संबंधित अधिकाऱ्यांनी नव्या पदाचा पदभार स्वीकारल्याबाबत पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. संबंधित अधिकारी पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

६. संबंधित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात येईल.

७. वर नमूद सर्व अधिकाऱ्यांना प्रतिनियुक्तीच्या पदांवर नियुक्ती / पदस्थापना देण्यात आली आहे. सदर नियुक्ती ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट दोन मध्ये विहित केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

८. संबंधित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीने पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१९१७२०५१०११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANGADHAR MAHAJAN GAIKWAD

Digitally signed by GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=5EEEAD19A0EF3D2434AFCCB36079E80E7EDE5A45017EC3297470E90AE602404B, cn=GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
Date: 2023.07.19 17:22:08 +05'30'

**( गं. म. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद /नांदेड / अमरावती/ नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
५. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे,
६. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
९. श्रीम. ज्योती चा. कुलकर्णी, अधीक्षक अभियंता व राज्य गुणवत्ता समन्वयक, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे,
१०. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१२. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, ग्रामविकास व पंचायत राज यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१६. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१७. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. कार्यासन आस्था-१ /२ /३, सेवा-६, रोख शाखा, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. निवडनस्ती.